**सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ई-निविदा संदर्भातील दिनांक २७-०९-२०१८ च्या शासन निर्णयातील तरतूदींबाबत स्पष्टीकरण...**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्र. सीएटी-२०१७/प्र.क्र.८/इमा-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २९-०१-२०१९

**वाचा :-** १. सार्वजनिक बांधकाम विभाग,शासन निर्णय क्र.सीएटी-२०१७/प्र.क्र.०८/इमा-२ दि.२७-०९-२०१८.
२. सार्वजनिक बांधकाम विभाग-शासन परिपत्रक क्र.सीएटी-२०१७/प्र.क्र.०८/इमा-२ दि.२२-१०-२०१८.
३. सार्वजनिक बांधकाम विभाग,शासन परिपत्रक क्र.सीएटी-२०१७/प्र.क्र.०८/इमा-२ दि.२६-११-२०१८.
४. सार्वजनिक बांधकाम विभाग,शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१५१/इमा-२ दि.१४-०१-१८.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ई-निविदा प्रक्रीयेंतर्गत निविदा प्रसिध्दी, निविदा लिफाफे उघडणे आणि निविदा तपासणी व इतर अनुषांगिक बाबींबाबत सविस्तर शासन निर्णय दि. २७-०९-२०१८ निर्गमित करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयातील काही तरतूदींसंदर्भात दि. २२-१०-२०१८ च्या परिपत्रकानुसार स्पष्टीकरण देण्यात आले आहे. त्यास अनुसरुन शासन निर्णयातील काही तरतूदींबाबत क्षेत्रीय स्तरावर संभ्रम निर्माण होत असल्याचे मुख्य अभियंता यांनी शासनाच्या निदर्शनास आणले असून याबाबत खालीलप्रमाणे स्पष्टीकरण करण्यात येत आहे :-

१. दि.२७-०९-२०१८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ४.३ व परिच्छेद ४.४ मधील तरतूदींबाबत विसंगती दूर करण्यात येत असून परिच्छेद ४.३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे प्रथम मागणीवेळी दोनच पात्र निविदा प्राप्त झाल्यास नियमानुसार लिफाफा क्र.२ (आर्थिक देकार) उघडून पुढील आवश्यक ती कार्यवाही करावी. प्रथम बोलीवेळी प्राप्त निविदांमध्ये तीन पात्र निविदा असण्याची आवश्यकता नाही.

२. दि.२७-०९-२०१८ शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२.९ (क) मधील देय कामासाठी मागील ५ वर्षापैकी कोणत्याही एका वर्षात ज्या महत्वाच्या परिमाणाच्या बाबी करावयाच्या असून त्याचे कमीत कमी परिमाण ३० % अपेक्षित आहे. असे करताना, प्राधान्यानुसार **फक्त पाच महत्वाच्या** बाबींसाठी परिमाण नमूद करावे.

३. दि.२७-०९-२०१८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २.२ व परिच्छेद क्र. २.९.१ (क) मधील तरतूदींच्या अनुषंगाने स्पष्ट करण्यात येते की, ज्या पूलांचा पाया निश्चित आहे अशा पूलांच्या रु. ५० कोटी किंमतीपर्यंतच्या निविदा EPC पध्दतीवर मागविण्यात याव्यात. इमारत बांधकामासाठी रु.१५ कोटी ते रु. २५० कोटी पर्यंतच्या निविदा SBD व्दारे व रु.२५० कोटी वरील रकमेच्या निविदा EPC पध्दतीने मागवाव्यात. अन्य बाबतीत दि. २७-०९-२०१८ मधील शासन निर्णयानुसार कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी.

४. दि.२७-०९-२०१८ शासन निर्णयातील परिच्छेद २.८ मध्ये सुरक्षा ठेव रक्कम ( Security Deposit) बाबत नमूद केले आहे. संदर्भ ४ वरील शासन निर्णयानुसार कामातील उणीवांच्या दुरुस्तीचा कालावधी (Defect Liability Period) निश्चित करण्यात आलेला आहे. उणीवांच्या दुरुस्तीच्या कालावधीत वाढ करण्यात आल्यामुळे सुरक्षा ठेव रक्कम कंत्राटदारास परत करण्याबाबत खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत. सदरच्या सुचना संदर्भ-४ च्या शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू राहतील.

४.१ दोष दायित्व कालावधी पूर्ण झाल्यानंतर कामाची गुणवत्ता तपासणी करुन संपूर्ण सुरक्षा ठेव रक्कम परत करावी.

४.२ दोष दायित्व कालावधी दोन वर्षापेक्षा जास्त असल्यास, काम पूर्ण झाल्यापासून दोन वर्षाच्या कालावधीनंतर एकूण सुरक्षा ठेव रक्कमेच्या ९०% रक्कम कंत्राटदारास परत करावी, व १०% रक्कम कोणत्याही राष्ट्रीयकृत बँकेच्या DD / FDR / BG च्या स्वरुपात घ्यावी व त्याचा कालावधी निविदेनुसार दोष दायित्व कालावधी संपल्यानंतर एक महिना कालावधीपर्यंत असावा. दोष दायित्व कालावधी पूर्ण झाल्यानंतर कामाची गुणवत्ता तपासणी करुन सदरची रक्कम परत करावी.

५. दि.२७-०९-२०१८ शासन निर्णयातील परिच्छेद ५.५ मध्ये यंत्रसामुग्रीबाबत नमूद केले आहे. यामध्ये (२) अंतर्गत कामांसाठी नवीन यंत्रसामुग्रीचे आयुर्मान १५ वर्षे गृहीत धरण्यात येण्याबाबत सूचना दिलेल्या आहेत. तथापि, परिवहन विभागाने १५ वर्षापुढील सुस्थितीतील वाहनांना परवाना दिल्यास सदरची यंत्रसामुग्री ग्राहय धरण्यात यावी.

६. ब-याचदा आढळून आले आहे की, एकाच निविदा सूचनेतील बहुसंख्य अथवा सर्व कामांकरीता एकच कंत्राटदार निविदा सादर करतात. अशावेळी कंत्राटदाराचा आर्थिक देकार उघडल्यानंतर बीड कॅपॅसिटीच्या पात्रतेनुसार बीड कॅपॅसिटी रक्कमेपर्यंतच्या कामासाठी कंत्राटदारास पात्र ठरविले जाते. ज्यावेळी अशी बाब निदर्शनास येईल त्यावेळी संबंधित कंत्राटदाराने संबंधित प्रादेशिक विभागात सादर केलेल्या सर्व निविदा विचारात घेऊन बीड कॅपॅसिटी परिगणित करुन कंत्राटदाराकडून प्रथम प्राधान्यक्रम घेवून त्यानुसार बीड कॅपॅसिटीच्या मर्यादेपर्यंतच निविदांचे आर्थिक देकार उघडण्यात यावेत.

७. अन्य बाबतीत असेही आढळून आहे आहे की, काही कंत्राटदार निविदा सादर केल्यानंतर म्हणेच Bid lock झाल्यानंतर तांत्रिक लिफाफा उघडताना त्यांचा लिफाफा क्र.२ उघडण्यात येऊ नये असे लेखी पत्राव्दारे निविदा समितीत/संबंधितांस कळवितात. त्यामुळे कंत्राटदारांचे संगनमत (Cartel Formation) झाले असण्याची शक्यता नाकारता येत नाही. अशावेळी संबंधित कंत्राटदाराचा लिफाफा क्र.२ उघडण्यात यावा व आर्थिक देकार उघडल्यानंतर संबंधित

कंत्राटदार पात्र ठरल्यास कार्यारंभ आदेश देण्यासंदर्भात नियमानुसार कार्यवाही करण्यात यावी. जर कंत्राटदाराने काम करण्यास असमर्थता दर्शविल्यास त्याची अनामत रक्कम जप्त करण्यात येऊन अशा कंत्राटदारास संबंधित प्रादेशिक विभागातील सर्व निविदा प्रक्रीयेत भाग घेण्यास एका वर्षासाठी प्रतिबंध करण्यात यावा. यासंबंधी संबंधित प्रादेशिक विभागातील मुख्य अभियंता यांना पूर्ण अधिकार राहतील. अशा निविदा प्रक्रीयेमध्ये अल्प कालावधीची फेरनिविदा मागवून पुढील आवश्यक कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९०१३०१०४३५८६४१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrashekhar Prabhakar Joshi

Digitally signed by Chandrashekhar Prabhakar Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2c8893d1513ab2ea4a7f8c612a31ac748bd05ab00efd5e22f2d25c9872e36d29, serialNumber=423be4ff70a89bfc945ec5e481b972d568094459d7ff8219a1f968860a431f89, cn=Chandrashekhar Prabhakar Joshi
Date: 2019.01.30 11:22:12 +05'30'

**( चंद्रशेखर जोशी )**
**सचिव (रस्ते), महाराष्ट्र शासन**

**प्रत--**

१) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव सर्व मंत्री राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४) महालेखापाल, (लेखापरिक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई.
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१, मुंबई.
६) महालेखापाल, (लेखापरिक्षा),महाराष्ट्र-२, नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-२, नागपूर.
८) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
९) अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई.
१०) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
११) सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.
१२) सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग, कार्यासन इमारती-१,२,३ , मंत्रालय, मुंबई.